# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०२१७/प्र.क्र.१०२/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ३० मार्च २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या अधिकारक्षेत्रातील भादवड, ता.भिवंडी, येथील पोलीस प्रशिक्षण विद्यालय, खाणावळ व व्यायामशाळा आणि ३२-पोलीस निरीक्षक निवासस्थाने यांची दुरुस्ती करण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/ ३७१/ ०९, दिनांक ०२.०२.२०१५.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या अधिकारक्षेत्रातील भादवड, ता.भिवंडी, येथील पोलीस प्रशिक्षण विद्यालय, खाणावळ व व्यायामशाळा आणि ३२-पोलीस निरीक्षक निवासस्थाने यांची दुरुस्ती करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी, सहायक अभियंता, श्रेणी-१, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, भिवंडी, जि. ठाणे, यांनी सन २०१३-१४ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.३९,२६,६५३/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे आणि अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, ठाणे, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते **रु.४६,१५,४२१/-** असे सुधारले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, भादवड, ता.भिवंडी, येथील पोलीस प्रशिक्षण विद्यालय, खाणावळ व व्यायामशाळा आणि ३२-पोलीस निरीक्षक निवासस्थाने यांची दुरुस्ती करण्यासाठी **रु.४६,१५,४२१/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८७/इमा-२, दिनांक १०.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०४०५१३०७१८३४२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil
Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.04.05 13:08:48 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, ठाणे शहर, ठाणे.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, ठाणे.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).